**फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरून शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून राज्यातील कायम विनाअनुदानित तत्वावर नवीन औषधनिर्माणशास्त्र संस्था सुरु करणे व विद्यमान औषधनिर्माणशास्त्र संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरु करणे इ. साठी शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२३/प्र.क्र.५७/तांशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २३ ऑगस्ट, २०२३.

**वाचा** : संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/पीसीआय-मान्यता(९)/२०२३-२४/ ७४१, दि.२२.०८.२०२३.

**प्रस्तावना** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून राज्यात नवीन औषधनिर्माणशास्त्र संस्था सुरु करणे व विद्यमान औषधनिर्माणशास्त्र संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरु करणे इ. साठी कायम विनाअनुदानित तत्वावर शासन मान्यता देण्याबाबत संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

**शासन निर्णय** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे, शैक्षणिक वर्ष २०२३-२०२४ पासून खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार Annexure - A व B मध्ये नमूद संस्थांना प्रचलित अटी व शर्तींच्या अधीन राहून कायम विनाअनुदानित तत्वावर शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अर्ज/ प्रस्ताव | सहपत्र |
|---|---|---|
| ०१ | नवीन औषधनिर्माणशास्त्र संस्था सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | Annexure - A |
| ०२ | विद्यमान संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | Annexure - B |

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता ही कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३) सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता सोबतच्या Annexure - A व B मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

४) शासनाने विहित केलेल्या तसेच फार्मसी कॉन्सिल ऑफ इंडिया ,नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदविका / पदवी / पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

३. ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य व संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये या शासन मान्यतेनुसार अभ्यासक्रमाचा समावेश होण्याकरीता संचालक, तंत्र शिक्षण व संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांनी आवश्यक ते आदेश पुढील १० दिवसाच्या आत निर्गमित करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२३१६५२२५२३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2023.08.23 16:57:39 +05'30'

**( शहाजहान मुलाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.
३) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालये (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलसचिव (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
६) संबंधित संस्था (संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
७) फार्मसी कौंन्सिल ऑफ इंडिया,कम्बाइन्ड कौंन्सिल बिल्डींग, कोटला रोड, ऐवान इ-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११० ००२.
८) सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षणविभाग), नवी दिल्ली.
९) निवड नस्ती/तांशि-४.

# Annexure A

Higher and Technical Education Department Government Resolution No.Manyata-2023/C.R.57/TE-4, Dated- 23rd August, 2023.

List of New Institute , Approved by PCI for A.Y. 2023-24

| SR. NO. | DTE CODE | PCI CODE | INSTITUTE NAME | STATUS | PROGRAMME | LEVEL OF COURSE | MAIN COURSE NAME | COURSE NAME | UNIVERSITY NAME | APPROVED INTAKE A.Y. 2022-23 | INTAKE APPROVED BY PCI A.Y.2023-24 | VARIATION |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | New | PCI-8387 | Rajmata Ahilyadevi Charitable Foundation's SVS College of Pharmaceutical Education and Research, Tembhurni, Tal.Madha, Dist.Solapur 413 211 | Un-Aided | PHARMACY | UNDER GRADUATE | Bachlor of Pharmacy | Pharmacy | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 60 | 60 |
| | | | | | | Diploma | Diploma in pharmacy | Pharmacy | Maharashtra State Board of Technical Education Mumbai | 0 | 60 | 60 |
| 2 | New | PCI-8596 | Shahajirao Patil Vikas Pratishthan's S B PATIL College of Pharmacy, Vangali, Indapur 413 106 | Un-Aided | PHARMACY | UNDER GRADUATE | Bachlor of Pharmacy | Pharmacy | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 60 | 60 |
| | | | | | | Diploma | Diploma in pharmacy | Pharmacy | Maharashtra State Board of Technical Education Mumbai | 0 | 60 | 60 |
| 3 | New | PCI-8554 | Dr. Ashok Gujar Institute of Pharmacy, Vidyanagar Extn. Banawadi, Tal.- Karad, Dist. Satara, 415124 | Un-Aided | PHARMACY | UNDER GRADUATE | Bachlor of Pharmacy | Pharmacy | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 60 | 60 |

## Annexure B

Higher and Technical Education Department G.R.No.Manyata-2023/C.R.57/TE-4, Dated- 23rd August, 2023.

List of New Course, Increase in intake in existing Unaided Pharmacy institute, Approved by PCI for A.Y. 2023-24

| SR. NO. | DTE CODE | PCI CODE | INSTITUTE NAME | STATUS | PROGRAMME | LEVEL OF COURSE | MAIN COURSE NAME | COURSE NAME | UNIVERSITY NAME | APPROVED INTAKE A.Y. 2022-23 | INTAKE APPROVED BY PCI A.Y.2023-24 | VARIATION |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1299 | PCI-4599 | N.K. College of Pharmacy, At Antraj, Tq.Khamgaon, Buldana 444 303 | Un-Aided | PHARMACY | UNDER GRADUATE | Bachlor of Pharmacy | Pharmacy | Sant Gadge Baba Amravati University, Amravati | 0 | 60 | 60 |